**वितरण आदेश**

**आमदार आदर्श ग्राम योजनेंतर्गत जोडनिधी करीता येणाऱ्या खर्चाकरीता अनुदान वितरीत करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
### ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः आआग्रायो-२०१५/प्र.क्र-७५/योजना-५
बांधकाम भवन इमारत,तळमजला
२५,मर्झबान पथ, फोर्ट,मुंबई-४०० ००१.
दिनांक : ०१ मार्च,२०१७.

**वाचा :-**

१) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल,२०१६

२) शासन निर्णय क्रमांकः आआग्रायो-२०१५/प्र.क्र.३६/योजना-५, दिनांक २० मे,२ ०१६.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या सांसद आदर्श ग्राम योजनेच्या धर्तीवर राज्यात आमदार आदर्श ग्राम योजना दिनांक २० मे,२०१५ च्या शासन निर्णयान्वये राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

आमदार आदर्श ग्राम योजनेतर्गत निवडलेल्या ग्राम पंचायतीमध्ये आमदार निधीतून घेण्यात येणाऱ्या, अनुज्ञेय असलेल्या कामांसाठी राज्य शासनांकडून समरुप जोडनिधी देण्याकरीता येणारा खर्च भागविण्याकरीता मागणी क्र.एल-३, २५०१,ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम, ००१ संचालन व प्रशासन, (००)(०५) आमदार आदर्श ग्राम योजनेंतर्गत जोडनिधी खर्चासाठी अनुदान, (२५०१ अे ०१२), ३५ भांडवली खर्च या लेखाशिर्षाखाली २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी रुपये ५ कोटी एवढा निधी अर्थसंकल्पित केला आहे.

**शासन निर्णय :-**

१. आमदार आदर्श ग्राम योजनेंतर्गत निवडलेल्या ग्रामपंचायतीमध्ये आमदार निधीतून करण्यात येणाऱ्या, अनुज्ञेय असलेल्या कामासाठी राज्य शासनाकडून समरुप जोडनिधी देण्याचे प्रस्तावित आहे. याकरीता मागणी क्र.एल-३, २५०१,ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम, ००१ संचालन व प्रशासन, (००)(०५) आमदार आदर्श ग्राम योजनेंतर्गत जोडनिधी करीता अनुदान, (२५०१ अे ०१२), ३५ भांडवली खर्च या लेखाशिर्षाखाली २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी आमदार आदर्श ग्राम योजनेंतर्गत जोडनिधी करीता येणारा खर्च भागविण्याकरीता रुपये ५,००,००,०००/- (रुपये पाच कोटी फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पित केला आहे.

---

२. सदर रक्कम मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान तथा राज्य समन्वयक अधिकारी, सांसद आदर्श ग्राम योजना व आमदार आदर्श ग्राम योजना यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून दिनांक ०१ मार्च,२०१७ रोजी सुपूर्द करण्यात येत आहेत. आमदार आदर्श ग्राम योजनेंतर्गत आमदार निधीतून करण्यात येणाऱ्या कामासाठी राज्य शासनाकडून समरुप निधी देण्याबाबत मंजूर करण्यात येणाऱ्या धोरणानुसारच निधीचे वितरण करण्यात येईल या अटीच्या अधिन राहून ८०% च्या मर्यादेत रुपये ४,००,००,०००/-( रुपये चार कोटी फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

सदरचा खर्च ग्राम विकास व जलसंधारण विभाग मागणी मागणी क्र. एल-३, २५०१,ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम, ००१ संचालन व प्रशासन, (००) (०५) आमदार आदर्श ग्राम योजनेंतर्गत जोडनिधी करीता येणाऱ्या खर्चासाठी अनुदान, (२५०१ अे ०१२), ३५ भांडवली या लेखाशिर्षाखाली सन २०१६-२०१७ च्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे, अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी. तसेच सदर निधी खर्च न झाल्यास संबंधित अधिकाऱ्यास जबाबदार धरण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान तथा राज्य समन्वयक अधिकारी, सांसद आदर्श ग्राम योजना व आमदार आदर्श ग्राम योजना यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीव्दारे (B.D.S.) वितरीत करण्यात येत आहे.

५. सदरहु अनुदान कोषागारातून काढल्यानंतर मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान तथा राज्य समन्वयक अधिकारी, सांसद आदर्श ग्राम योजना व आमदार आदर्श ग्राम योजना यांनी खाली नमूद केलेली माहिती त्वरित लेखाधिकारी, योजना-२, बांधकाम भवन, २५-मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१ यांच्याकडे पाठविण्यात यावी.

१) मंजूर केलेली रक्कम,
२) कोषागारातून काढलेली रक्कम,
३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक
४) सदर निधी खर्च झाल्याबाबतचा उपयोगिता प्रमाणपत्र.
५) महालेखापाल कार्यालयातील रकमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १२/२०१७, व्यय-१५, दिनांक १३ फेब्रुवारी,२०१७ अन्वये आमदार आदर्श ग्राम योजनासाठी प्रशासकिय विभागांना त्याचे स्तरावर वितरीत करण्याचा प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत-

---

स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201703011638321420 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arunkumar S Pawar

Digitally signed by Arunkumar S Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arunkumar S Pawar
Date: 2017.03.03 12:41:35 +05'30'

**अरुण शं.पवार**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मंत्री, ग्रामविकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुबई.
२) मा.राज्यमंत्री, ग्रामविकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल (लेखापरिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१,मुंबई.
५) महालेखापाल (लेखापरिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२,नागपूर.
६) संचालक, लेखा व कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) संचालक, निवासी व लेखा कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालये (सर्व)
९) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालये (सर्व)
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान तथा राज्य समन्वयक, सांसद आदर्श ग्राम योजना व आमदार आदर्श ग्राम योजना, सिडको भवन, ५ वा मजला, दक्षिण विभाग, सी.बी.डी.बेलापूर, नवी मुंबई.
१२) उप आयुक्त, (विकास) विभागीय आयुक्त कार्यालये (सर्व).
१३) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व).
१४) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१५) मुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१६) उपसचिव, वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई.
१७) संचालक, अर्थ व सांख्यिकी, महाराष्ट्र राज्य मुंबई.
१८) वरिष्ठ लेखाधिकारी, शासनस्तर अंतर्गत लेखा परिक्षण पथक, बांधकाम भवन,मुंबई-०१
१९) कक्ष अधिकारी (योजना-१/२/३/४/५/६/७/८/९/१०), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मुंबई-००१.
२०) कक्ष अधिकारी (वित्त-१/२/३/४/५/६/७/८/९) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मुंबई-००१.
२१) निवडनस्ती (योजना-५).